**पोलीस उप अधिक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर या पदास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पीडब्ल्यूएस ०२२३/प्र.क्र.३०१/पोल-४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक : ११ एप्रिल, २०२५**

**संदर्भ** : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-१००९/प्र.क्र.२६/कोषा प्र-५, दि. २४.०६.२००९
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीडब्ल्यूएस-०५१९/प्र.क्र.३५१/पोल-४, दि. २८.०३.२०२२
३) विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालय यांचे पत्र क्र.पोमंस/३६/र.व का.(८३००)/आहरण व संवितरण/पुणे/५९/२०२३, दि. १७.०८.२०२३
४) विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालय यांचे पत्र क्र.पोमंस/३६/र.व का.(८३००)/आहरण व संवितरण-पुणे/५९/२०२३, दि. १०.१०.२०२४
५) पोलीस अधीक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र. पोअमवि/लेशा/आ.सं.अ./शासन आदेश/२०२४-८५४, दि. १२.१२.२०२४

**प्रस्तावना:** पोलीस बिनतारी संदेश विभागांतर्गत विविध संवर्गाचे एकत्रिकरण करुन संदर्भाधीन क्र. २ येथील दि. २८.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयानुसार विभागाची पुनर्रचना (सुधारित आकृतीबंध) करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार, पोलीस अधीक्षक, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयाची नव्याने निर्मिती करण्यात आलेली आहे. तसेच, अपर पोलीस महासंचालक व संचालक, पोलीस दळणवळण, माहिती तंत्रज्ञान व परिवहन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाकडून दि. ०२.०१.२०२४ रोजीच्या कार्यालयीन आदेशाद्वारे पोलीस अधीक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर यांना "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने, नवनिर्मित पोलीस अधीक्षक, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक कार्यालयाने व पोलीस अधीक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी त्यांच्या संदर्भ क्र. ३, ४ व ५ येथील पत्रान्वये पोलीस उप अधिक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर या पदास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्या अनुषंगाने सदरहू पदास "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पोलीस महासंचालक कार्यालयाच्या तसेच पोलीस अधीक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्या संदर्भाधीन क्र. ३, ४ व ५ येथील पत्रांन्वये प्राप्त प्रस्तावानुसार पोलीस

उप अधिक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर या पदास पोलीस अधीक्षक, पोलीस दळणवळण व माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्याची देयके पारित करण्यासाठी **“आहरण व संवितरण अधिकारी”** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**२.** संबंधित क्षेत्रिय कार्यालयाने आहरण व संवितरण अधिकारी सांकेतांक क्रमांक प्राप्त करुन घेण्यासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि. २४.०६.२००९ रोजीच्या शासन परिपत्रकात नमूद केलेल्या कार्यवाहीचा अवलंब करावा.

**३.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४३/२०२५/कोषाप्रशा ५, दि. २८.०१.२०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक २०२५०४१११७४०१००९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांक्षित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADKAR PRATAP SAMPATRAO

Digitally signed by MADKAR PRATAP SAMPATRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=691ba5cde50be5ad4d70b5410e666a3f513b4fd3934f0227b3aab4ff49ee9941, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B6C9D92AA5599BE94C2F37BF0363AAF3D243DE73A6A2F15A0AE751006929371A, cn=MADKAR PRATAP SAMPATRAO
Date: 2025.04.11 17:40:51 +05'30'

**( प्रताप माडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. अपर पोलीस महासंचालक व संचालक, पोलीस दळणवळण व परिवहन, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन),महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. पोलीस अधीक्षक, पोलीस दळणवळण, माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर
५. पोलीस उप अधिक्षक, पोलीस दळणवळण, माहिती तंत्रज्ञान, मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर
६. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
८. कक्ष अधिकारी, कार्यासन -व्यय-७/कोषा-प्रशा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती, गृह विभाग/ पोल-४,मंत्रालय, मुंबई